महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी स्वतंत्र सक्षम प्राधिकारी व अनुषंगिक कर्मचारीवृंद पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एमपीआय १११८/प्र.क्र. ६८४/पोल-११

दुसरा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
तारीख: २२ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :**

**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस २०१५/प्र.क्र. १३०१/पोल-११, दिनांक २९ जून, २०१७**

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम १९९९ च्या प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता तसेच अधिनियमान्वये दाखल प्रकरणांच्या तपासामध्ये सहाय्य करण्यासाठी स्वतंत्र सक्षम प्राधिकारी व अनुषंगिक कर्मचारीवृंद यांची आवश्यकता असल्याने वाचा येथील शासन निर्णयान्वये निर्मित १२ पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ च्या कलम ५ (१) प्रमाणे सक्षम प्राधिकारी (२ पदे) व इतर अनुषंगिक कर्मचारीवृंद असे खालीलप्रमाणे एकुण १२ पदांना दिनाक ३०.६.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या | |
|---|---|---|---|---|
| | | | नियमित | बाह्ययंत्रणेद्वारे |
| १ | उपजिल्हाधिकारी | रु.१५६००-३९००० अधिक ग्रेड वेतन ५८०० | ०२ | - |
| २ | लेखाधिकारी | रु.९३००-३४००० अधिक ग्रेड वेतन ४४०० | ०२ | - |
| ३ | अव्वल कारकून | रु.५२००-२०२०० अधिक ग्रेड वेतन ३५०० | ०२ | - |
| ४ | लिपिक टंकलेखक | रु.५२००-२०२०० अधिक ग्रेड वेतन १९०० | ०२ | - |
| ५ | लिपिक | ठोक रक्कमेवर | - | ०२ |
| ६ | शिपाई | ठोक रक्कमेवर | - | ०२ |
| एकूण | | | ०८ | ०४ |

२. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३०/१८/व्यय-७, दिनांक १५.१०.२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२२११४४५८८८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: CN = Yuvraj B Ajetrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2018.10.22 12:10:15 +05'30'

**(युवराज ब. अजेटराव)**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
५. जिल्हाधिकारी, मुंबई शहर
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई
९. निवडनस्ती (पोल-११ कार्यासन).